नाशिक जिल्ह्यातील 'क' वर्गीय पर्यटन
स्थळाच्या विकासासाठी जिल्हा वार्षिक
योजना सन २००३-२००४ अंतर्गत
नियतव्यय वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एमटीसी २००३/१/प्रक्र.४८०/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-३२ दिनांक १४ जानेवारी, २००४.

वाचा:- जिल्हाधिकारी, नाशिक यांचे पत्र क्र. जिनिस-क.१२/सां.स.२/१०३२,
दिनांक ६.१०.२००३.

**शासन निर्णय :-** जिल्हा पातळीवरील योजनांसाठी वार्षिक योजना सन २००३-२००४ मध्ये करण्यात आलेल्या तरतूदीमधून नाशिक जिल्ह्यासाठी रु. ३४,९९,०००/- (रु. चौतीस लाख, नव्व्याण्णव हजार फक्त) च्या नियतव्ययास शासनाकडून अंतिमत: मंजुरी देण्यात आली आहे. सदरची कामे पूर्ण करण्यासाठी नियोजन विभागाच्या कोअर प्लॅनप्रमाणे अर्थसंकल्पित झालेली रक्कम रुपये २१,०२,९७५/- (रुपये एकवीस लाख दोन हजार नऊशे पंचाहत्तर फक्त) एवढी आहे. जिल्हाधिकारी, नाशिक यांनी खाली दर्शविलेल्या कामांच्या नकाशे, आराखडे व खर्चाच्या तपशीलास दिनांक ५.९.२००३ रोजी प्रशासकीय मान्यता दिली आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | कामाची अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १ | रा. मा.-२३ तहसिल ऑफिस ते गोंदेश्वर मंदिर रस्ता रुंदीकरण व डांबरीकरण करणे. | १५,५४,९८६/- |

२. सन २००३-२००४ मध्ये करण्यात आलेल्या तरतूदीमधून अर्थसंकल्पीत कोअर नियतव्यय रुपये २१,०२,९७५/- (रु. एकवीस लाख दोन हजार नऊशे पंचाहत्तर फक्त) च्या ५५% रक्कम म्हणजेच रु. ११,५६,६३६/- (रु. अकरा लाख,छप्पन्न हजार सहाशे छत्तीस फक्त) एवढी रक्कम अदा करण्यास शासन मंजुरी देत आहे.

३. वर परिच्छेदामध्ये नमूद करण्यात आलेला खर्च हा २००३-०४ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष " ३४५२ पर्यटन मागणी क्र. बी-७ - ०१ पर्यटनासाठी पायाभूत सुविधा-१०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०२) (११) पर्यटन विकासासाठी 'अ ब क' श्रेणीमध्ये वर्गीकृत केलेली ठिकाणे (३४५२ १७८१) " या लेखा शिर्षाखाली मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी जिल्हाधिकारी, नाशिक यांना 'आहरण व संवितरण अधिकारी' म्हणून घोषित करण्यात येत असून संबंधित देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्यासही प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, नाशिक यांनी याबाबत विहीत

कार्यपध्दतीचा अवलंब करुन रक्कम आपल्या ताब्यात घेऊन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी. मंजुर करण्यात आलेल्या रु. ११,५६,६३६/- (रु. अकरा लाख, छप्पन्न हजार सहाशे छत्तीस फक्त) चे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, नाशिक यांनी महालेखाकार (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर यांना सादर करावे व त्याची एक प्रत शासनास न चुकता सादर करावी. तसेच सदर रक्कम त्याच कामासाठी खर्ची घालावी. मंजुर अनुदानापेक्षा जादा खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. जिल्हाधिकारी, नाशिक यांनी सदरची रक्कम तात्काळ संबंधित कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करावी व सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, कामाची भौतिक प्रगति तसेच सुपूर्द करण्यात आलेल्या रक्कमेचे विनियोग दर्शविणारे विवरण इत्यादीचा अहवाल दरमहा १० तारखेपर्यंत न चुकता सादर करावा.

५. जिल्हाधिकारी, नाशिक यांनी सदर अनुदानाची रक्कम कोषागारातून काढल्यावर त्यासंबंधीच्या देयकाचा प्रमाणक क्रमांक, देयकाची रक्कम, कोषागाराचे नांव, दिनांक इ. माहिती खर्च मेळ घालून शासनास सादर करावी.

६. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-१२०८/२००३/व्यय-८, दिनांक ९.१२.२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(र. य. नलावडे)

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,
जिल्हाधिकारी, नाशिक,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई,
महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा- नाशिक,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, जिल्हा - नाशिक,
नियोजन विभाग (का.१४१२), मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (का. व्यय-८), मंत्रालय, मुंबई,
गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती. कार्यासन-पर्यटन